**पदोन्नती -**
**वरिष्ठ प्रशासकीय अधिकारी गट अ पोलीस आयुक्त बृहन्मुंबई यांचे कार्यालय.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्र: रापोसे-०४१४/प्र.क्र.१२०/पोल-१अ,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक :- २ सप्टेंबर, २०१५.

संदर्भ :- पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांचे पत्र क्र. पोआ/कक्ष-४(१)/१५, दि. २१.०२.२०१५.

**शासन आदेश :-**

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या कार्यालयातील वरिष्ठ प्रशासकीय अधिकारी (गट-अ) या पदावर पदोन्नती देण्यासाठी तयार करण्यात आलेल्या सन २०१३-१४ च्या निवडसूचीमध्ये समाविष्ट करण्यात आलेल्या खालील "प्रशासकीय अधिकारी (गट-ब)" दर्जाच्या अधिकाऱ्यास, "वरिष्ठ प्रशासकीय अधिकारी (गट-अ)" या संवर्गातील पदावर पदोन्नती देण्यात येत आहेत :-

निवडसूची २०१३-१४

| अ.क्र. | निर्देशसूचीतील/ ज्येष्ठता यादीतील अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नांव व प्रवर्ग | निवडसूचीवरील समावेशनाचा प्रवर्ग |
|---|---|---|---|
| १ | १/१६ | श्री. राहुल नथुजी कांबळे (अ.जा.) | खुला |

२. उपरोक्त अधिकाऱ्यास पदोन्नतीने पदस्थापना देण्याबाबत, पोलीस आयुक्त, बृहहन्मुंबई यांनी आवश्यक ती कार्यवाही करावी.

३. उपरोक्त अधिकाऱ्याविरूध्द विभागीय / संक्षिप्त / प्राथमिक चौकशी / न्यायालयीन कार्यवाही, प्रलंबित / प्रस्तावित असल्यास, सामान्य प्रशासन विभागाच्या दि. २ एप्रिल, १९७६ च्या परिपत्रकामधील तरतुदीनुसार त्यांच्याविरूध्दच्या प्रलंबित / प्रस्तावित विभागीय / संक्षिप्त / प्राथमिक चौकशीच्या / न्यायालयीन कार्यवाहीच्या अधीन राहून, त्यांना तात्पुरत्या स्वरूपात उक्त पदोन्नती देण्यात येत आहे. त्यांच्याविरूध्द प्रलंबित / प्रस्तावित / संक्षिप्त / प्राथमिक चौकशीअंती होणारी शिक्षा ते पदोन्नतीच्या पदावर भोगण्यास तयार असल्याचे हमीपत्र त्यांच्याकडून घेऊनच त्यांना पदोन्नती देण्यात यावी.

४. उपरोक्त अधिकाऱ्यास देण्यात आलेली पदोन्नती, मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल याचिका क्र: २७९७/२०१५ व याचिका क्र.४७०/२००५ मधील अंतिम निर्णयाच्या, तसेच, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून करण्यात येत आहेत.

५. उपरोक्त अधिकाऱ्यास पदस्थापना देताना, मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण अथवा अन्य मा. न्यायालयाचे स्थगिती आदेश असल्यास, ते विचारात घेऊन उक्त अधिकाऱ्यास पदस्थापना देण्यात यावी.

६. उक्त पदोन्नती देण्यात आलेल्या अधिकाऱ्यास, सध्याच्या पदावरून कार्यमुक्त करून, त्यांना पदोन्नतीच्या पदावर रूजू होण्यासाठी पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांनी आवश्यक ती कार्यवाही त्वरित करावी.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१५०९०२१२२३२७५८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Charushila Chandrakant Tambekar

Digitally signed by Charushila Chandrakant Tambekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2b0496c0c213a3f50c6522cc39ae5de95e1150ac3287e89c21b1422e313820a2, cn=Charushila Chandrakant Tambekar
Date: 2015.09.02 13:25:36 +05'30'

**(चारुशीला तांबेकर)**
**सह सचिव, गृह विभाग.**

**प्रति,**

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.

**प्रतिलिपि,**

१) महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. राज्यमंत्री (गृह) (शहर/ग्रामिण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६) सामान्य प्रशासन विभाग (कार्या.१२), मंत्रालय, मुंबई.
७) संबंधित अधिकारी (पोलीस महासंचालक यांचेमार्फत)
८) निवडनस्ती (कार्या. पोल-१अ)